**महाराष्ट्र शासन**

क्र.जिपब०५११/प्र.क्र.६२(२) ते ७०(२)/आस्था१४
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोंबर, २०११.

प्रति,
मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा परिषद (सर्व)

**विषयः** जिल्हा परिषद वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांची आंतरजिल्हा बदलीची प्रकरणे निकाली काढण्याबाबत.

**संदर्भः**(१) शासनपत्र क्र.जिपब०५११/प्र.क्र.६२(२)ते ७०(२)/आस्था१४, दिनांक १२ जुलै, २०११
(२) शासन परिपत्रक क्र.जिपब०७११/प्र.क्र.११३/११/आस्था१४, दिनांक २९ सप्टेंबर, २०११

उपरोक्त विषयावरील संदर्भाधीन पत्र कृपया पहावे.

२. सदर पत्रान्वये ज्या कर्मचाऱ्यास ५ वर्षे व त्यापेक्षा जास्त कालावधी झालेला आहे. अशा कर्मचाऱ्यांची अट शिथिल करण्याचा निर्णय घेतलेला आहे असे संदर्भाधीन पत्र क्र.१ च्या पत्रान्वये कळविण्यात आलेले होते. परंतु अशा कर्मचाऱ्यांचा सेवाविषयक तपशिल शासनाकडे उपलब्ध नसल्याने त्यांचा सेवा तपशिल सादर करण्यात यावा असे कळविण्यात आले होते.

३. कर्मचाऱ्यांचे सेवाविषयक तपशिल प्राप्त करुन घेण्यासाठी शासन स्तरावरुन प्रयत्न करण्यात आले होते. परंतु बऱ्याच जिल्हा परिषदांनी संपूर्ण कर्मचाऱ्यांची सेवाविषयक परिपूर्ण माहिती सादर केली नाही.

४. दरम्यानच्या कालावधीत आंतरजिल्हा बदली बाबतचे अधिकार दिनांक २९-९-२०११ च्या परिपत्रकान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर परिपत्रकातील तरतुदी आणि शासन पत्र दिनांक १२-७-२०११ अन्वये दिलेले निर्देश याचा तौलनिक विचार करुन शासन स्तरावरुन घेतलेल्या निर्णयानुसार आपणास पाठविण्यात आलेल्या यादीतील कर्मचाऱ्यांच्या आंतरजिल्हा बदलीबाबत प्राधान्याने विचार करावा.

(व.दी.राठोड)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.